**ई-निविदा कार्यप्रणालीमध्ये ई-पेमेंट गेटवे (e payment Gateway)ची सुविधा कार्यान्वित करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः सीओएम-२०११/प्र.क्र.११/२०११ संगणक कक्ष

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक :- ०८.१२.२०१४

वाचा

१) **सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन पत्र क्रमांक सीओएम २०११/प्र.क्र.११/संगणक कक्ष, दिनांक १४.११.२०१३**

२) **माहिती तंत्रज्ञान संचालनालय, , शासन निर्णय, क्रमांक GAD-DIT ०८०/२/२०१४-DIT (MH), दिनांक १३.०८.२०१४.**

३) **माहिती तंत्रज्ञान संचालनालय, शासन पत्र क्रमांक MH-९०१२/२/२०१३-DIR-DIT(MH) दिनांक ११.११.२०१४.**

## शासन परिपत्रक

ई-निविदा कार्यप्रणालीमध्ये ई पेमेंट गेटवेची सुविधा विभागाच्या अधिपत्याखालील १२ पथदर्शी कार्यालयांमध्ये उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील पत्रान्वये सुरु करण्यात आली आहे. सदर सुविधा राज्यातील सर्व विभागीय कार्यालयांमध्ये कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन यासंदर्भात माहिती तंत्रज्ञान विभागाने दिनांक ११.११.२०१४ रोजी घेतलेल्या आढाव्याअंती आता पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. उपरोक्त संदर्भ क्रमांक ३ यास अनुसरुन यापुढे ऑनलाईन ई-पेमेंट गेटवे (e payment Gateway) चा वापर करणे बंधनकारक आहे.
२. वरील सूचनांच्या अनुषंगाने ई-निविदा कार्यप्रणालीमध्ये ई-पेमेंट गेटवे (e payment Gateway) ची सुविधा आता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभागीय कार्यालयात कार्यान्वित करण्यात यावी.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर हे ई-पेमेंट गेटवे (e payment Gateway) कार्यप्रणालीकरिता समन्वय अधिकारी असून सर्व विभागीय कार्यालयांनी या संदर्भातील पुढील कार्यवाहीसाठी त्यांच्याशी तात्काळ संपर्क साधून ई-पेमेंट गेटवे (e payment Gateway) ची सुविधा तात्काळ सुरु करण्याबाबतची कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०८१११५०८८७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DANGE PRADEEP BHASKARRAO

Digitally signed by DANGE PRADEEP BHASKARRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PWD,CID - 917071, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DANGE PRADEEP BHASKARRAO
Date: 2014.12.08 15:13:05 +05'30'

( प्रदीप डांगे )
उप सचिव

प्रत,

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे/मुंबई/औरंगाबाद/अमरावती/नागपूर/नाशिक/विद्युत प्रकल्प मुंबई/राष्ट्रीय महामार्ग, मुंबई/विद्युत मुंबई
२. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य मुंबई
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
४. संचालक, उद्यान व उपवने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे
६. सर्व अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,
७. मा. मंत्री यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
८. मा. राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
९. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. सर्व कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग
१२. सर्व उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२